विद्युत निरीक्षक, गट-अ (राजपत्रित) संवर्गातील अधिकाऱ्यांच्या नियतकालिक बदल्या सन २०२३.

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन आदेश क्र. बदली-२०२३/प्र.क्र.६९/ऊर्जा-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ३२.
दिनांक:- ३० जुन, २०२३.

**वाचा:-** १) महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांचे बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५.
२) महाराष्ट्र नागरी सेवा ( पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१.
३) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन अधिसूचना क्र. संकीर्ण-२०१६/प्र.क्र.७०/ऊर्जा-५, दि. २४.०५.०२०१८.

**शासन आदेश:-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ४ (१), (२), (३) व (४) मधील तरतूदीनुसार मुख्य विद्युत निरीक्षक, मुंबई यांच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील विद्युत निरीक्षक, गट-अ (राजपत्रित) या संवर्गातील अधिकाऱ्यांना त्यांच्या नावासमोर स्तंभ क्र. ४ मध्ये दर्शविण्यात आलेल्या पदावर सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने सार्वजनिक सेवेच्या हितार्थ व प्रशासकीय सोयीच्या दृष्टीने बदलीने पदस्थापना देण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव व पदनाम | सध्याची पदस्थापना | बदलीनंतर पदस्थापना |
|---|---|---|---|
| *१* | *२* | *३* | *४* |
| १. | श्रीमती राखी मनोहर नागपुरे, विद्युत निरीक्षक | विद्युत निरीक्षक, निरीक्षण विभाग, अमरावती. | विद्युत निरीक्षक, निरीक्षण विभाग, वाशिम (श्री. सारंग नाईक, वि. नि. यांच्या बदलीने रिक्त होणाऱ्या पदावर.) |
| २. | श्री. संजय आदिनाथ आंबेकर, विद्युत निरीक्षक | विद्युत निरीक्षक, निरीक्षण विभाग, खामगांव (बुलढाणा) | विद्युत निरीक्षक, निरीक्षण विभाग, वर्धा (श्री. अविनाश वनारकर, वि. नि. यांच्या बदलीने रिक्त होणाऱ्या पदावर.) |
| ३. | श्री. अविनाश दिपचंद वनारकर, विद्युत निरीक्षक | विद्युत निरीक्षक, निरीक्षण विभाग, वर्धा. | विद्युत निरीक्षक, निरीक्षण विभाग, भंडारा (श्री. आर. आर. गिरी, वि. नि. यांच्या सेवानिवृत्तीने रिक्त झालेल्या पदावर.) |

| | | | |
|---|---|---|---|
| ४. | श्री. सारंभ सुभाष नाईक, विद्युत निरीक्षक | विद्युत निरीक्षक, निरीक्षण विभाग, वाशिम. | विद्युत निरीक्षक, निरीक्षण विभाग, खामगांव (बुलढाणा) (श्री. संजय आंबेकर, वि.नि. यांच्या बदलीने रिक्त होणाऱ्या पदावर.) |
| ५. | श्री. प्रदीप महादेवराव चामट, विद्युत निरीक्षक | विद्युत निरीक्षक, निरीक्षण विभाग, नागपूर. | विद्युत निरीक्षक, निरीक्षण विभाग, अमरावती (श्रीमती राखी नागपूरे, वि.नि. यांच्या बदलीने रिक्त होणाऱ्या पदावर.) |
| ६. | श्री. राजेंद्र रा. चव्हाण, विद्युत निरीक्षक | विद्युत निरीक्षक, निरीक्षण विभाग, पेण (रायगड). | विद्युत निरीक्षक, निरीक्षण विभाग, सिंधुदूर्ग (श्री. अनिलकुमार पाटील, वि.नि. यांच्या प्रस्तावित विनंती बदलीने रिक्त होणाऱ्या पदावर.) |
| ७. | श्री. अशोक गणपती कणसे, विद्युत निरीक्षक | विद्युत निरीक्षक, निरीक्षण विभाग, सांताक्रुझ. | विद्युत निरीक्षक, निरीक्षण विभाग क्र. १, ठाणे या रिक्त पदावर |
| ८. | श्री. उमाकांत केशवराव धोटे, विद्युत निरीक्षक | विद्युत निरीक्षक (सचिव, अनुज्ञापक मंडळ व उद्वाहन निरीक्षक, मुंबई) | विद्युत निरीक्षक, निरीक्षण विभाग, नागपूर (श्री. प्रदीप चामट, वि.नि. यांच्या बदलीने रिक्त होणाऱ्या पदावर.) |

२. मुख्य विद्युत निरीक्षक, मुंबई यांनी बदली झालेल्या अधिकाऱ्यांना त्यांच्या बदलीच्या ठिकाणी त्वरीत कार्यभार घेता यावा म्हणून आवश्यक ती स्थानिक पर्यायी व्यवस्था करुन सध्याच्या पदभारातून तात्काळ कार्यमुक्त करावे व त्यांना बदलीच्या ठिकाणी ताबडतोब रुजू होण्यास सांगावे.

३. महाराष्ट्र नागरी सेवा ( पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ मधील नियमांनुसार दिलेल्या विहित कालावधीत संबंधित अधिकारी यांनी पदस्थापनेच्या ठिकाणी रूजू होण्याची दक्षता घ्यावी. अन्यथा या पदस्थापनेच्या पदावर रूजू न झाल्यास, त्यांचा **अनुपस्थितीचा कालावधी हा "अकार्यदिन" (dise non) म्हणून गणला जाईल**. तसेच, संबंधितांविरूध्द शासन निर्णय, क्र. संकीर्ण-२०१६/प्र.क्र.१८६/१६/कार्यासन-१४, दि. २३.१२.२०१६ मधील तरतूदींनुसार शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

४. वरील अधिकाऱ्यांना नियमानुसार अनुज्ञेय असणारा पदग्रहण अवधी, प्रवास भत्ता व दैनिक भत्ता देय राहील.

५. संबंधित अधिकाऱ्यास शासनाच्या पूर्वपरवानगीशिवाय कोणत्याही कारणास्तव रजा मंजूर करू नये. तसेच, महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, १९८१ मधील नियम-३० (सी) नुसार मुळ कार्यालयाने बदली झालेल्या अधिकाऱ्यांचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्विकारू नयेत. असे अर्ज प्राप्त झाल्यास ते संबंधित अधिकाऱ्यांना मुळ पत्त्यावर नोंदणी पोच देय डाकेने परत करावेत.

६. सदरहू आदेशानुसार पदस्थापनेच्या पदावर तात्काळ रूजू न झाल्यास वा कोणत्याही प्रकारचा दबाव आणून बदली रद्द करणे तसेच त्यामध्ये बदल करण्याचा प्रयत्न झाल्यास, ही कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक)

नियम १९७९ मधील नियम २३ चे उल्लंघन करणारी असल्यामुळे, ती गैरवर्तणूक समजून त्यांचेविरूध्द शिस्तभंग विषयक कारवाई करण्यात येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

७. तसेच उपरोक्त तक्त्यात नमुद बदली झालेल्या अधिकाऱ्यांनी बदली अधिनियमानुसार सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने पारित केलेल्या आदेशाचे पालन न करणे ही बाब गंभीर स्वरूपाची असून यामुळे पालन न करणारा अधिकारी, विभागीय चौकशी नियम पुस्तिका १९९१ च्या प्रकरण २ मधील कलम २.१ (२) (पाच) अन्वये निलंबनाच्या कार्यवाहीस पात्र ठरेल.

८. संबंधित विद्युत निरीक्षक, गट-अ यांनी नियुक्तीच्या नवीन ठिकाणी तात्काळ रुजू होऊन तसा अनुपालन अहवाल मुख्य विद्युत निरीक्षक, मुंबई यांच्यामार्फत शासनास न चुकता सादर करावा.

९. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२३०६३०१४५१५६४५१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAM CHAUDHARI

Digitally signed by RAM CHAUDHARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSRTY, ENERGY AND LABOUR DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e44d5d15adae961af6d1ac849c24fa6be219c4e5a8accfa2ef8db48a9c886c40, pseudonym=8EDCBBC09460CD9488F7A18CC48C8B95B3908056, serialNumber=08959C5CFE10323630591C090854AAD890486067A7D6331EC64E373717E8D56D, cn=RAM CHAUDHARI
Date: 2023.06.30 14:54:22 +05'30'

**( राम सु. चौधरी )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मुख्य विद्युत निरीक्षक , उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, प्रशासकीय इमारत, ३ रा मजला, रामकृष्ण चेंबुरकर मार्ग, चेंबुर (पू.) मुंबई-७१.
२) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर.
३) अधिदान व लेखा अधिकारी मुंबई/निवासी लेखाधिकारी, मुंबई
४) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
५) अधीक्षक अभियंता, प्रादेशिक विद्युत निरीक्षण मंडळ, मुंबई/पुणे/छ. संभाजीनगर/नागपूर.
६) सर्व संबंधित विद्युत निरीक्षक (मुख्य विद्युत निरीक्षक, मुंबई यांच्यामार्फत)

**प्रत:**

१) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव.
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
३) मा. उपमुख्यमंत्री तथा मा. मंत्री (ऊर्जा) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) प्रधान सचिव (ऊर्जा) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई ४०००३२.
५) उपसचिव (ऊर्जा-१), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) निवडनस्ती (ऊर्जा-१).